**दि.२९ डिसेंबर, २०१९ रोजी होणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सार्वत्रिक/पोट निवडणुकासाठी सदर क्षेत्रातील मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: मतदान २०१९/प्र.क्र.११७/कामगार-९**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १३ डिसेंबर, २०१९

संदर्भ :- राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे क्रमांक रानिआ/नप-२०१९/प्र.क्र.६/का.६, दि.०६ डिसेंबर,२०१९ रोजीचे पत्र.

**शासन परिपत्रक-**

आपल्या देशाने लोकशाही पध्दती स्विकारली असून १८ वर्षावरील नोंदणी झालेल्या सर्व लोकांनी प्रत्येक निवडणुकीमध्ये १०० टक्के मतदान करणे अपेक्षित आहे. ही बाब लक्षात घेता लोकप्रतिनिधीत्व कायदा,१९५१ च्या परिच्छेद १३५ब नुसार मतदानाच्या दिवशी सर्वसाधारणपणे मतदारांना त्यांचा मतदानाचा हक्क बजावता यावा यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात येते किंवा काही ठिकाणी कामाच्या तासात योग्य ती सवलत देण्यात येते. मात्र गेल्या काही निवडणुकांमध्ये असे दिसून आले आहे की, संस्था/ आस्थापना इ. भरपगारी सुट्टी किंवा सवलत देत नाहीत. यामुळे अनेक मतदारांना त्यांच्या मतदानापासून वंचित रहावे लागते, जे लोकशाहीसाठी अत्यंत घातक आहे.

राज्य निवडणूक आयोगाने निर्गमित केलेल्या आदेशाप्रमाणे दि.२९ डिसेंबर, २०१९ रोजी सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सार्वत्रिक/पोट निवडणूक घेतली जाणार आहे. सदर निवडणुकीमध्ये सर्व मतदारांना त्यांचा मतदानाचा हक्क योग्यरितीने बजावता यावा यासाठी खालील प्रमाणे आदेश देण्यात येत आहेत:-

I) निवडणूक होणाऱ्या मतदान क्षेत्रात मतदार असलेले कामगार/अधिकारी/कर्मचारी यांना मग ते कामानिमित्त निवडणूक होणाऱ्या क्षेत्राबाहेर कार्यरत असले तरीही त्यांना निवडणुकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात यावी.

II) सदर सुट्टी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागांतर्गत येणाऱ्या सर्व आस्थापना, कारखाने, दुकाने इत्यादींना लागू राहिल (उदा.खाजगी कंपन्या या मधील आस्थापना, सर्व दुकाने व इतर आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्य गृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती व तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर, मॉल्स, रिटेलर्स इ.)

III) अपवादात्मक परिस्थितीत कामगार, अधिकारी, कर्मचारी इत्यादींना पूर्ण दिवस सुट्टी देणे शक्य नसेल तर, मतदान क्षेत्रातील कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी सुट्टी ऐवजी कमीत कमी दोन तासांची सवलत देता येईल. मात्र त्याबाबत त्यांनी संबंधित जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी यांची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहिल. कोणत्याही परिस्थितीत मतदारांना मतदानासाठी किमान दोन तासांची सवलत मिळेल याची दक्षता संबंधित आस्थापना मालकांनी घेणे आवश्यक राहिल.

IV) वर नमूद केल्यानुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाअंतर्गत येणाऱ्या सर्व आस्थापना, कारखाने, दुकाने इत्यादींच्या मालकांनी/व्यवस्थापनाने वरील सूचनांचे योग्य ते अनुपालन होईल याची काटेकोरपणे

खबरदारी घ्यावी. मतदारांकडून मतदानाकरिता योग्य ती सुट्टी अथवा सवलत प्राप्त न झाल्याने मतदान करता येणे शक्य न झाल्याबाबत तक्रार आल्यास, त्यांच्याविरुध्द योग्य कारवाई करण्यात येईल.

४. सदर परिपत्रक राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे क्रमांक रानिआ/नप-२०१९/प्र.क्र.६/का.६, दि.०६ डिसेंबर, २०१९ रोजीच्या पत्रास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१२१३१२०९५९०६१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHANASHYAM CHHAGAN MANGLE

Digitally signed by GHANASHYAM CHHAGAN MANGLE
DN: c=IN, o=Personal, postalCode=421301, st=Maharashtra, 2.5.4.20=fca734170ed8d5a351c6a072c8be8b677ae31e0d8a30780ddbdfa590dc9e5078, 2.5.4.45=0321006538620D001EE962E1EF8CBF6A49C0BA382EB9D4B391F4B8291EA50D68927D08, serialNumber=947baa00a868d0354e47019e5609bcccbc77f0fd538d48adecf0e4f2b5c96e2a, cn=GHANASHYAM CHHAGAN MANGLE
Date: 2019.12.13 12:13:50 +05'30'

**( जी. सी. मंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**- उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधित आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

१. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई-३२
२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. कामगार आयुक्त, वांद्रे, मुंबई-५१ (निवडणूक होणाऱ्या ठिकाणी संबंधितांना सुचना देण्याबाबत कार्यवाहीच्या विनंतीसह अग्रेषित)
४. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, वांद्रे, मुंबई (निवडणूक होणार्या ठिकाणी संबंधितांना सुचना देण्याबाबत कार्यवाहीच्या विनंतीसह अग्रेषित)
५. संचालक, बाष्पके, वांद्रे, मुंबई, (निवडणूक होणाऱ्या ठिकाणी संबंधितांना सुचना देण्याबाबत कार्यवाहीच्या विनंतीसह अग्रेषित)
६. प्रशासक/मुख्याधिकारी(नगरपंचायत/नगरपरिषद), कोल्हापूर, यवतमाळ, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, सातारा, सांगली, सोलापूर, नाशिक, जळगाव, नंदुरबार, उस्मानाबाद, अमरावती, नागपूर,वर्धा, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, महाराष्ट्र राज्य.
७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर, यवतमाळ, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, सातारा, सांगली, सोलापूर, नाशिक, जळगाव, नंदुरबार, उस्मानाबाद, अमरावती, नागपूर,वर्धा, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली, महाराष्ट्र राज्य.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई यांना व्यापक प्रसिध्दी देण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
९. कामगार विभागातील सर्व कार्यासने

**प्रत माहितीसाठी :**

१ मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२ मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
३ मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट-१

## दिनांक २९/१२/२०१९ रोजी होणाऱ्या सार्वत्रित व पोटनिवडणुकांचा तपशील

| अ.क्र. | जिल्हा | सार्वत्रिक निवडणूक असलेल्या नवनिर्मित नगरपंचायती | नगरपरिषदेचे नाव (हद्दवाढ क्षेत्राची निवडणूक) | न.प./न.प. च्या रिक्त अध्यक्ष व सदस्य पदांची पोट निवडणूक असलेले प्रभाग व जागा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | कोल्हापूर | चंदगड | --- | --- |
| २ | कोल्हापूर | हातकणंगले | --- | --- |
| ३ | यवतमाळ | ढाणकी | --- | --- |
| ४ | कोल्हापूर | --- | गडहिंग्लज | --- |
| ५ | रत्नागिरी | --- | --- | रत्नागिरी नगरपरिषद-अध्यक्ष |
| ६ | सिंधुदुर्ग | --- | --- | सावंतवाडी नगरपरिषद-अध्यक्ष |
| ७ | सातारा | --- | --- | मलकापूर नगरपरिषद-प्रभाग क्र.-७-ब |
| | | | | वाई नगर परिषद- प्रभाग क्र.-८-अ |
| ८ | सांगली | --- | --- | खानापूर नगरपंचायत- प्रभाग क्र.-७ |
| ९ | सोलापूर | --- | --- | बार्शी नगरपरिषद- प्रभाग क्र.-५-अ |
| १० | नाशिक | --- | --- | मनमाड नगरपरिषद-प्रभाग क्र-१-ब |
| ११ | जळगाव | --- | --- | धरणगाव नगरपरिषद- अध्यक्ष |
| | | | | भुसावळ नगरपरिषद- प्रभाग क्र.-४-अ |
| | | | | भडगाव नगरपरिषद- प्रभाग क्र.-३-ड |
| १२ | नंदुरबार | --- | --- | नवापूर नगरपरिषद- प्रभाग क्र.-६-अ |
| | | | | नवापूर नगरपरिषद- प्रभाग क्र.-७-अ |
| १३ | उस्मानाबाद | --- | --- | परंडा नगरपरिषद- प्रभाग क्र.-७-ब |
| १४ | अमरावती | --- | --- | मोर्शि नगरपरिषद- अध्यक्ष |
| १५ | नागपूर | --- | --- | उमरेड नगरपरिषद-प्रभाग क्र.-११-अ |
| | | | | भिवापूर नगरपंचायत- प्रभाग क्र.- ४ |
| १६ | वर्धा | --- | --- | सिंदी (रेल्वे) नगरपरिषद- प्रभाग क्र.-८-क |
| १७ | भंडारा | --- | --- | मोहाडी नगरपंचायत- प्रभाग क्र.- ४ |
| | | | | मोहाडी नगरपंचायत- प्रभाग क्र.- ९ |
| | | | | मोहाडी नगरपंचायत- प्रभाग क्र.- १२ |
| | | | | साकोली नगरपरिषद- प्रभाग क्र.- ६-ब |
| १८ | चंद्रपूर | --- | --- | कोरपना नगरपंचायत- प्रभाग क्र.-१६ |
| १९ | गडचिरोली | --- | --- | भामरागड नगरपंचायत- प्रभाग क्र.- ५ |
| | | | | भामरागड नगरपंचायत- प्रभाग क्र.- १६ |

---------------